कोरोना Lockdown शिथिल झाल्यानंतर राज्यातील शाळांमध्ये शिक्षकांच्या उपस्थितीबाबत मार्गदर्शक सूचना

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.८६/एसडी-६
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. २४ जून २०२०

वाचा : १. केंद्र शासनाचे गृह मंत्रालयाचे आदेश, क्र.MHA No ४०-३/२०२० DM-I(A), दि. ३०.०५.२०२०
२. महसूल व वन विभागाचे आपत्ती व्यवस्थापन आदेश क्र. DMU-२०२०/CR-९२-I/DSM दि.३१.०५.२०२०
३. मा. मुख्यमंत्री यांची दि. ३१ मे २०२० ची व्हिडीओ कॉन्फरन्स
४. शासन पत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकीर्ण २०११/(१४३/११)/प्राशि-५, दि. ३०.०५.२०११
५. शासन परिपत्रक शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि. १५.०६.२०२०

प्रस्तावना :-

राज्यात कोराना (कोविड-१९) विषाणूच्या प्रादूर्भावामुळे विपरीत परिस्थिती निर्माण झाली आहे. अशा परिस्थितीमध्ये शिक्षण व शैक्षणिक वर्ष वेळेवर सुरू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सन २०२०-२१ हे शैक्षणिक वर्ष सुरु करण्याबाबत दि. १५ जून २०२० च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. यामध्ये विविध घटकांच्या जबाबदाऱ्या निश्चित केल्या आहेत. सदर शासन निर्णयामधील परिशिष्टामध्ये शाळा पूर्व तयारीच्या पंधरवडयामध्ये कोणती कार्यवाही करावी याबाबत सुचना देण्यात आलेल्या आहेत. यामध्ये अधिक स्पष्टता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

परिपत्रक :-

१.१ राज्यातील मुंबई, ठाणे, नवी मुंबई, पालघर जिल्हयातील सार्वजनिक वाहतूक व्यवस्था अत्यावश्यक सेवांसाठीच सुरु करण्यात आलेल्या आहेत. त्यामुळे शिक्षकांना शाळेमध्ये उपस्थित राहण्यामध्ये अडचणी निर्माण होऊ शकतील. ही बाब विचारात घेता शिक्षकांसाठी वर्क फ्रॉम होमची सवलत देण्यात येत आहे. तथापि शाळा सुरू करणेची तयारी व ई लर्निंग बाबत मुख्याध्यापकांनी आठवडयातून दोन दिवस बोलविल्यास उपस्थित रहावे.

१.२ महिला शिक्षिका, मधुमेह, श्वसनाचे विकार असलेले, रक्त दाब, हृदयविकार इत्यादी सारखे गंभीर आजार असलेले व ५५ वर्षावरील पुरूष शिक्षक यांना शाळेमध्ये न बोलविता त्यांना प्रत्यक्ष शाळा सुरु होण्याच्या कालावधीपर्यंत तात्पुरत्या स्वरुपात वर्क फ्रॉम होम ची सवलत देण्यात येत आहे.

१.३ तसेच यापैकी ज्या शिक्षकांची शाळेमध्ये उपस्थिती अत्यावश्यक असेल अशा शिक्षकांना शाळेमध्ये बोलविण्याबाबत संबंधित मुख्याध्यापकांनी / शाळा व्यवस्थापन समितीने परिस्थितीनुरुप निर्णय घ्यावा. अशा शिक्षकांना शक्यतो आठवडयामध्ये एक किंवा दोन दिवसापेक्षा जास्त वेळा बोलवू नये तसेच एकाच दिवशी सर्व शिक्षकांना शाळेत बोलावू नये.

१.४ ज्या शिक्षकांच्या सेवा कोविड आजारासंबंधित कामकाजासाठी अधिग्रहीत करण्यात आलेल्या आहेत त्यांना कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित शिक्षणाधिकारी यांनी स्थानिक प्रशासनाशी संपर्क साधून कार्यमुक्त

करण्याची कार्यवाही करावी. अन्य आस्थापनेवर समायोजित सरप्लस शिक्षकांनाही मूळ शाळेत बोलावून ऑनलाईन शिक्षण प्रक्रियेत त्यांचा उपयोग करून घ्यावा.

१.५ ज्या ठिकाणी शाळा क्वारंटाईनसाठी प्रशासनाने ताब्यात घेतल्या असतील त्या ठिकाणी शाळा मुख्याध्यापकांच्या ताब्यात येईपर्यंत कोणत्याही शिक्षकांना शाळेत बोलावू नये.

२. स्थानिक प्रशासनाच्या संमती शिवाय शिक्षण विभागातील क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी शाळा सुरु करणेबाबत, शिक्षक उपस्थितीबाबत कोणतेही निर्देश देवू नयेत.

३. परिस्थितीनुरूप बदलत्या अध्ययन अध्यापन पध्दतींचा वापर करण्यासाठी शिक्षकांचे सक्षमीकरण करण्यासाठी राज्य शैक्षणिक सेशोधन व प्रशिक्षण परिषद महाराष्ट्र, पुणे व संबंधित जिल्हयाच्या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था यांनी शिक्षकांचे ऑनलाईन प्रशिक्षणाचे नियोजन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००६२६१३०३२६३२२१ आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.06.26 13:46:06 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव
५) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य
१०) शिक्षण संचालक, प्राथमिक
११) राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३) सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी
१४) निवड नस्ती (एसडी-६)